सन २०२३-२०२४ टंचाई अंतर्गत मुळशी, ता. मुळशी येथील प्रादेशिक नळ पाणी पुरवठा योजनेच्या विशेष दुरूस्तीस प्रशासकीय मान्यता देणेबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः टंचाई २०२४ /प्र.क्र. ५३/पापु १४**

जी. टी. रुग्णालय संकुल इमारत, ७ वा मजला,
मंत्रालय, मुंबई ४०० ००१
तारीख: ९ मे, २०२४

वाचा-

१) शासन निर्णय,पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्रमांक: टंचाई १०९९/प्र.क्र. १२/पापु १४, दिनांक ३.२.१९९९

२) शासन निर्णय पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्रमांक: टंचाई २०१८/प्र.क्र.२०/पापु १४, दिनांक १४.०२.२०१८

३) विभागीय आयुक्त, पुणे यांचे पत्र क्रमांक : विकास/कार्यासन-५/कावि/२०२४, दिनांक ०८.०४.२०२४.

४) भारत निवडणूक आयोग पत्र क्रमांक ४३७/MH-HP/२०२१ (c Vigil)/WS-II, दिनांक ०७/०५/२०२४.

प्रस्तावना-

दिनांक १४/०२/२०१८ मुद्दा क्रमांक ७ येथील तरतुदीनुसार दिनांक ३१ मार्च नंतर नळ पाणी पुरवठा योजनेच्या दुरूस्तीच्या कामाच्या प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देण्याचे अधिकार क्षेत्रिय कार्यालयास नसल्याने, विभागीय आयुक्त, पुणे विभाग, पुणे यांनी सन २०२३-२४ च्या टंचाई कालावधीसाठी मुळशी, ता. मुळशी या प्रादेशिक नळ पाणी पुरवठा योजनेच्या रुपये ५०,००,०००/- किंमतीच्या विशेष दुरूस्तीच्या कामास प्रशासकीय मान्यता देण्याचा प्रस्ताव संदर्भाधीन क्रमांक ३ येथील पत्रान्वये शासनास सादर केला आहे.

राज्यामध्ये सन २०२४ च्या लोकसभा निवडणूकीच्या अनुषंगाने दिनांक १६/०३/२०२४ पासून आदर्श आचारसंहिता घोषित झाल्याने तसेच मुळशी, ता. मुळशी हे प्रादेशिक नळ पाणी पुरवठा योजनेचे क्षेत्र दुष्काळ घोषित क्षेत्रामध्ये येत नसल्याने, विषयाधीन प्रस्तावास भारत निवडणूक आयोगाची मान्यता मिळणेकरिता प्रस्ताव सादर करण्यात आला होता, त्यास संदर्भाधीन क्रमांक ४ येथील पत्रान्वये भारत निवडणूक आयोगाने मान्यता दिली आहे.

मुळशी, ता. मुळशी येथील प्रादेशिक नळ पाणी पुरवठा योजनेच्या कामास भारत निवडणूक आयोगाने दिलेली मान्यता विचारात घेता, मुळशी, ता. मुळशी या प्रादेशिक नळ पाणी पुरवठा योजनेच्या विशेष दुरूस्तीच्या कामास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

विभागीय आयुक्त, पुणे विभाग, पुणे यांनी संदर्भाधीन क्रमांक ३ अन्वये सादर केलेल्या मुळशी, ता. मुळशी या प्रादेशिक नळ पाणी पुरवठा योजनेच्या रुपये ५०,००,०००/- ( अक्षरी रुपये पन्नास लाख फक्त ) किंमतीच्या विशेष दुरूस्तीच्या कामास संदर्भाधीन क्रमांक २ येथील दिनांक १४/०२/२०१८ च्या शासन निर्णयातील मुद्दा क्रमांक ७ येथील तरतुदीनुसार "विशेष बाब" म्हणून खालील अटींच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे :-

१) जिल्हाधिकारी, पुणे यांनी मुळशी तालुक्यात पिण्याच्या पाण्याची टंचाई निर्माण झाली असल्याचे सर्व प्रथम घोषित करावे.
२) सदर योजनेच्या कामाचा राजकीय फायदा/लाभ मिळण्याच्या अनुषंगाने आदर्श आचारसंहिता कालावधीमध्ये विपरीत प्रसिद्धी होणार नाही, याची जिल्हाधिकारी, पुणे यांनी दक्षता घ्यावी.
३) सदर प्रस्तावात नमूद केलेली प्रादेशिक नळ पाणी पुरवठा योजना, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, पुणे यांचेमार्फत राबविण्यात यावी.
४) सदर योजनेची कामे विहित पध्दतीने ई-निविदा मागविण्यात येऊन करावीत.
५) योजनेचे काम मान्यता प्राप्त किंमतीमध्येच पूर्ण होईल याची दक्षता घ्यावी.
६) योजनेची निविदा अल्प मुदतीची (०७ दिवस ) काढण्यास परवानगी देण्यात येत आहे.
७) निविदा प्रक्रिया दिनांक १७ मे, २०२४ पर्यंत पूर्ण करुन कार्यारंभ आदेश देणे आवश्यक आहे.
८) निविदा प्रक्रिया दिनांक १७ मे, २०२४ पर्यंत पूर्ण करण्यात यावी.
९) योजनेची कामे दिनांक १८ जून, २०२४ पर्यंत पूर्ण करुन योजनेतून पाणी पुरवठा सुरु होणे आवश्यक आहे.
१०) सदर योजनेची प्रस्तावात नमूद केलेली कामे जिल्हा परिषद, पुणे मार्फत पूर्ण करण्यात आल्यानंतर योजनेची देखभाल दुरुस्ती व योजनेचे व्यवस्थापन संबंधित ग्रामपंचायतमार्फत करणे आवश्यक राहील.
११) योजनेचे काम मुदतीत पूर्ण होणे आवश्यक असल्याने योजनेच्या निविदा प्रक्रियेपासून ते योजनेतून पाणीपुरवठा सुरु होईपर्यंत आठवडयाच्या प्रत्येक सोमवारी प्रगती अहवाल शासनास पाठविण्यात यावा.

२. **याबाबत होणारा खर्च "मागणी क्र. वाय-२, मुख्य लेखाशिर्ष २२१५ पाणी पुरवठा व स्वच्छता, ०१, पाणी पुरवठा, १९६ जिल्हा परिषद पंचायत / संस्थांना सहाय्य, ०२ जिल्हा परिषदांना अनुदान, (०२)(०३) आकस्मिक पिण्याच्या पाण्याच्या टंचाई निवारणार्थ घेण्यात येणा-या तात्पुरत्या**

**उपाययोजनांसाठी जिल्हा परिषदांना सहायक अनुदान (अनिवार्य), ३१, सहायक अनुदाने (वेतनेत्तर) (२२१५ ए १९५) " या लेखाशीर्षांखाली मंजूर असलेल्या तरतूदीतून भागवावा व त्याखाली अंतिमत: खर्ची टाकण्यात यावा.**

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०५०९१७०५३१११२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

PRAVINKUMAR GULABRAO PAWAR

Digitally signed by PRAVINKUMAR GULABRAO PAWAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER SUPPLY AND SANITATION DEPARTMENT, 2.5.4.20=5d2dad0f66e8336730e2b666877a365c20f60db099de815eecadde01ca77f148, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=8F18625ADB482A7EE2512CEA93CE697388C95A99C89E41E85C05A3DE8476488F, cn=PRAVINKUMAR GULABRAO PAWAR
Date: 2024.05.09 17:42:54 +05'30'

**(प्रविणकुमार पवार)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
२. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
३. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
४. प्रधान सचिव, महसूल ( मदत व पुनर्वसन) विभाग, मंत्रालय, मुंबई
५. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई,
६. महालेखाकार, (लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई
७. महालेखाकार, (लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, नागपूर
८. विभागीय आयुक्त, पुणे विभाग, पुणे
९. जिल्हाधिकारी, पुणे
१०. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, पुणे
११. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
१२. कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, पुणे
१३. मा. मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
१४. प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
१५. निवड नस्ती (पापु-१४ )